**शालेय स्तरावर सक्तीची मराठी भाषा अधिनियमांतर्गत नियमावली तयार करण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: समिती - २०२०/प्र.क्र.१३७/एसडी-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: ३० सप्टेंबर, २०२०.

वाचा:- १) महाराष्ट्र राज्यातील सर्व शाळांमध्ये मराठी भाषेचे अध्यापन व अध्यन सक्तीचे करण्यासाठी आणि तत्संबंधी किंवा तद्नुषंगिक बाबींसाठी तरतूद करण्याकरिता अधिनियम-२०२० महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३,दिनांक ०९ मार्च,२०२०.

२) शासन अधिसूचना "महाराष्ट्र शाळांमध्ये मराठी भाषेचे सक्तीचे अध्यापन व अध्ययन अधिनियम,२०२०" मराठी भाषा विभाग,मंत्रालय,मुंबई,दिनांक १६ मार्च,२०२०.

३) शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१९/प्र.क्र.७८/एसडी-४,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,मुंबई,दिनांक ०१ जून,२०२०.

४) संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परीषद,महाराष्ट्र,पुणे यांचे क्र. राशैसंप्रपम/ अविवि/ मराठी भाषा नियमावली समिती/२०२०-२१/१२३७,दिनांक १९.०६.२०२०

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र राज्यातील सर्व शाळांमध्ये मराठी भाषेचे अध्यापन व अध्ययन सक्तीचे करण्यासाठी अधिनियम पारित करण्यात आला असून त्याद्वारे राज्यात इयत्ता पहिली ते दहावी पर्यंत सर्व माध्यमाच्या सर्व मंडळाच्या व सर्व व्यवस्थापनाच्या शाळांमध्ये मराठी भाषेचे अध्यापन व अध्ययन सक्तीचे करण्यात आले आहे. तसेच या अधिनियमातील कलम १६ (१) नुसार अधिनियमाची प्रयोजने पार पाडण्यासाठी राज्य शासनाला नियम करण्याचा अधिकार असेल असे नमूद करण्यात आले आहे. सदर कायद्याची अंमलबजावणी दिनांक ०१/०४/२०२० पासून करण्यात आलेली आहे. या कायद्याच्या अंमलबजावणी संदर्भात शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने संदर्भ क्र.३ चा शासन निर्णय निर्गमित केलेला आहे. शालेय स्तरावर सक्तीची मराठी भाषा अधिनियमांतर्गत नियमावली तयार करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय:-**

उपरोक्त अधिनियम व शासन निर्णय यातील तरतुदीच्या अनुषंगाने नियमावली तयार करण्यासाठी पुढीलप्रमाणे समितीचे गठन करण्याचे निश्चित करण्यात आले आहे.

| अ.क्र. | अधिकारी/तज्ञ यांचे नाव | पद |
|---|---|---|
| १. | श्री.दिनकर पाटील<br>संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परीषद,महाराष्ट्र,पुणे | अध्यक्ष |
| २. | श्री.राजेंद्र पवार<br>उपसचिव,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई | सदस्य |
| ३. | श्री.अशोक भोसले<br>सचिव,माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ,पुणे | सदस्य |
| ४. | श्री.विकास गरड<br>प्र.प्राचार्य,समन्वय विभाग, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परीषद,महाराष्ट्र,पुणे | सदस्य |
| ५. | श्री.जगराम भटकर<br>उपविभागप्रमुख,मराठी भाषा विभाग, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परीषद,महाराष्ट्र,पुणे | सदस्य |
| ६. | श्री.राजीव पाटोळे<br>विशेषाधिकारी,महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ (बालभारती),पुणे | सदस्य |
| ७. | श्रीमती नंदा राऊत<br>अवर सचिव,मराठी भाषा विभाग,मंत्रालय,मुंबई | सदस्य |
| ८. | श्रीमती वर्षाराणी भोपळे<br>उपविभागप्रमुख,अभ्यासक्रम विकसन विभाग, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परीषद,महाराष्ट्र,पुणे | सदस्य सचिव |

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९३०१७४११९४४२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2020.09.30 17:44:06 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव,

२) अपर मुख्य सचिव,शालेय शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक.

३) सचिव,मराठी भाषा विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.

४) उपसचिव,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.

५) शिक्षण आयुक्त,महाराष्ट्र राज्य,पुणे.

६) संचालक,राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परीषद,महाराष्ट्र,पुणे

७) शिक्षण संचालक,(माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य,पुणे.

८) शिक्षण संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य,पुणे.

९) सचिव,माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ,पुणे.

१०) संचालक,महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ (बालभारती),पुणे.

११) विशेषाधिकारी,महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ (बालभारती),पुणे.

१२) निवड नस्ती/एसडी-४.